**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील संचालक (तांत्रिक) यांचे पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करण्याकरिता विभागीय पदोन्नती समिती घटीत करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन पुरकपत्र क्रमांकः मजीप्रा-२०१४/ प्र. क्र. १७३ / पापु-२३**

७ वा मजला, गो. ते. रुग्णालय संकुल
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १२ ऑगस्ट, २०१४

## संदर्भ

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आदेश क्र.डीपीए-१०८६/(२२१)/ई-६ दिनांक ११ मार्च, १९८७
२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आदेश क्र.डीपीए-१०८६/(२२१)/ई-६ दिनांक २९ डिसेंबर, १९८९
३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आदेश क्र.डीपीए-१०८६/(२२१)/ई-६ दिनांक २३ एप्रिल, १९९०
४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आदेश क्र.डीएलई-१०९५/(२३९८)/आ-६, दिनांक १ मार्च, १९९६
५) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आदेश क्र. डीएलई-१०९९/(१२)/ आ-६ दिनांक १७ मार्च, १९९९
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र. मजीप्रा/ अअ-पदो./२०१३/ ईटी-३१८/ आ-१, दिनांक १५.७.२०१४
७) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. मजीप्रा-२०१४/ प्र. क्र. १७३/ पापु-२३ दिनांक २ ऑगस्ट, २०१४

## प्रस्तावना

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता व प्रशासन तसेच लेखा शाखेतील समकक्ष दर्जाचे अधिकारी यांचे पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करण्याकरिता विभागीय पदोन्नती समिती घटीत करण्यात आलेली आहे. आता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या विशेष कार्य अधिकारी-नि-सदस्य (तांत्रिक) या पदाच्या पदनामामध्ये बदल करुन सदर पदाचे संबोधन संचालक (तांत्रिक) असे करण्यात आले असून हे पद महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या वरिष्ठ मुख्य अभियंत्यांमधून सेवाज्येष्ठता व अर्हता विचारात घेऊन पदोन्नतीने भरण्याचा निर्णय शासनामार्फत घेण्यात आलेला आहे. या पदास सचिव स्तरावरील वेतन व भत्ते (रु. ३७४००-६७०००- ग्रेड वेतन रु. १०,०००) लागू राहतील. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील संचालक (तांत्रिक) हे पद दिनांक २ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीमार्फतच भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सबब शासन निर्णय दिनांक २ ऑगस्ट, २०१४ मध्ये पुढीलप्रमाणे अंशत: बदल करण्यात येत आहे.

## शासन पुरकपत्र

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील), मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता व प्रशासन तसेच लेखा शाखेतील समकक्ष दर्जाचे अधिकारी यांचे पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करण्याकरिता शासन निर्णय पाणी पुरवठा व

स्वच्छता विभाग क्रमांक मजीप्रा-२०१४/ प्र. क्र. १७३ / पापु-२३ दिनांक २ ऑगस्ट, २०१४ अन्वये गठीत करण्यात आलेल्या विभागीय पदोन्नती समितीमार्फतच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील संचालक (तांत्रिक) हे पद भरण्यात यावे.

सदर शासन पुरकत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२१४४६२७९४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.08.12 16:49:36 +05'30'

**(महेश भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२.सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३.सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
४.संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन, नवी मुंबई.
५.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई.
६.महालेखापाल,(लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२ नागपूर.
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर.
९. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालये, बांद्रे, मुंबई.
११.निवडनस्ती पापु-२३ , पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई